**मत्स्यव्यवसाय विभागातील पदांचा आढावा**

सह आयुक्त मत्स्यव्यवसाय (प्रशासन) हे पद
उपायुक्त मत्स्यव्यवसाय (प्रशासन) मध्ये
रुपांतर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक- मत्स्यआ २००८/प्र.क्र.२३९/पदुम-१२
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
**दिनांक- २७ नोव्हेंबर, २००९.**

वाचा :- १) शासन निर्णय क्र. मत्स्यआ २००६/प्र.क्र.८२/पदुम-१२ दि. ६/१/२००७
२) शासन निर्णय क्र. मत्स्यआ-२००६/प्र.क्र.८३/पदुम-१२ दि.३० मार्च,२००७
३) वित्त विभागाचे शासन पत्र क्रमांक-पदनि-१०.०९/प्र.क्र.७८/२००९/वित्तीय सुधारणा-१ दि. १ सप्टेंबर,२००९
४) आयुक्त (मत्स्य) यांचे पत्र क्र.मत्स्य/प्रशा/१४११०१/५०/२००८ दि. २४/९/२००८ व दि.२०.६.२००९

प्रस्तावना :-

राज्यशासनाच्या आस्थापनेवरील सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या नियंत्रणाखाली विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख यांच्या कार्यालयातील अस्तित्वात असलेल्या सर्व पदांचा आढावा घेऊन पद भरती व पदांचा पदावनतबाबतचा निर्णय व इत्यादींबाबत वित्त विभागाच्या आदेशानुसार व मार्गदर्शक सूचनांनुसार मत्स्यव्यवसाय विभागातील पदांचा सर्वंकष आढावा घेण्यात आला आहे. त्यास उच्चस्तरीय सचिव समितीने दिनांक २७ ऑगस्ट,२००९ रोजी झालेल्या बैठकीत मंजुरी दिली आहे. सदर मंजुरीनुसार सुधारित १०५० पदांच्या आकृतिबंधापैकी मत्स्यव्यवसाय गट अ संवर्गात "सह आयुक्त मत्स्यव्यवसाय (प्रशासन)" हे पद उपआयुक्त (मत्स्यव्यवसाय) (प्रशासन) या पदात रुपांतर करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

शासन निर्णय **:-**

आयुक्त मत्स्य यांच्या अधिपत्याखाली मत्स्यसेवा गट अ (वरिष्ठ-प्रशासकीय) या संवर्गातील "सहआयुक्त मत्स्य (प्रशासन)" वेतनश्रेणी रु.१२०००-१६५०० या पदाचे **"उपआयुक्त मत्स्य (प्रशासन)"** वेतनश्रेणी रु. १०,६५०-१५,८५० या **निम्नश्रेणीच्या पदात रुपांतरीत करण्यास** शासन मान्यता देत आहे.

२.	सदर शासन निर्णय दि. २७ ऑगस्ट २००९ रोजी झालेल्या ५५ व्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीत समितीने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या अधिकृत संकेत स्थळावर www.maharashtra.goe.in वर उपलब्ध असुन त्यांचा संगणक संकेतांक २००९११३०१८३५५७००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( प. श. अहमद )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव,
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२,
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
सचिव (प्र.सु.व र.व का.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (व्यय), वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग (व्यय-१ / वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई,
आयुक्त (मत्स्यव्यवसाय), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
प्रादेशिक उपआयुक्त मत्स्यव्यवसाय, मुंबई, नाशिक, नागपूर, पुणे, अमरावती, औरंगाबाद
सर्व सहाय्यक आयुक्त (तांत्रिक),
सर्व मत्स्य विकास अधिकारी / मत्स्य प्रशिक्षण अधिकारी,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
पदुम-१३/ पदुम-१४ कृषि व पदुम विभाग
निवड नस्ती.